ई-निविदा कार्यप्रणाली अवलंबिण्याबाबत.
जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्रामपंचायत स्तरावरील बांधकामे व साहित्य पुरवठ्याची कामे e-Tendering प्रक्रीयेतून करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१७/प्र.क्र.११४/पंरा-७
मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
तारीख: ४ ऑगस्ट, २०१७

**वाचा :-**

१) शासन निर्णय ग्रा.वि.व ज.सं.वि. क्र ग्रासयो-२००७/प्र.क्र.०१/यो-९ दि. २०.०४.२००७
२) शासन निर्णय ग्रा.वि.व ज.सं.वि. क्र संकीर्ण-२०१०/२७५/प्र.क्र.१७२/पंरा-७ दि. १९.१०.२०११
३) शासन निर्णय ग्रा.वि.व ज.सं.वि. क्र संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१४८/यो-९ दि. ०२.१२.२०१६

**प्रस्तावना :-**

उपरोक्त वाचा १ येथील शासन निर्णयान्वये कंत्राटदारांना ग्रामविकास व जलसंधारण विभागामार्फत पंजीकरण अनिवार्य करण्यात आले आहे. त्यानुसार,कंत्राटदारांना स्वतंत्र पंजीकरण देण्याची प्रक्रिया पार पाडण्यात येत आहे. या शासन निर्णयानुसार प्राप्त होणाऱ्या प्रस्तावांची छाननी करताना काही मुद्यांबद्दल संदिग्धता निर्माण होत होती, म्हणून सदरचा शासन निर्णय वाचा ३ येथील शासन निर्णयान्वये अधिक्रमित करुन सुधारीत शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. त्यामध्ये, सुशिक्षित बेरोजगार अभियंत्यांसाठी पुर्वीच्या दिनांक २०.०४.२००७ च्या शासन निर्णयातील पतदारी प्रमाणपत्राची अट वगळण्यात आली आहे. तथापि, वाचा २ येथील शासन निर्णयामधील अ.क्र. ०३.०२ (६) येथे पतदारी प्रमाणपत्र विहीत नमुन्यात सादर करणे बंधनकारक राहील अशी अट नमुद केली आहे. तसेच, सुशिक्षित बेरोजगार अभियंता / कंत्राटदार यांच्याकडून पतदारी दाखला किती रकमेचा घेण्यात यावा, याबाबत स्पष्ट उल्लेख नसल्यामुळे राज्यात संदिग्धता निर्माण झाली आहे. त्याचप्रमाणे सार्वजनिक बांधकाम विभागामध्ये सुशिक्षित बेरोजगार अभियंता / कंत्राटदार नोंदणीसाठी पतदारी प्रमाणपत्र घेण्यात येत नाही. त्यानुषंगाने बेरोजगार असणाऱ्या युवकाकडून पतदारी प्रमाणपत्र घेणे योग्य होणार नाही. ही वस्तुस्थिती लक्षात घेता, वाचा १ येथील शासन निर्णयामधील अ.क्र. ०३.०२ (६) येथे “पतदारी प्रमाणपत्र विहीत नमुन्यात सादर करणे बंधनकारक राहील” ही अट वगळण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

वाचा २ येथील शासन निर्णयामधील अ.क्र. ०३.०२ (६) येथे “पतदारी प्रमाणपत्र विहीत नमुन्यात सादर करणे बंधनकारक राहील” ही अट वगळण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०८०४११२३४१६४२० आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

R A Nagargoje

Digitally signed by R A Nagargoje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=decff3a81eacee2237c8c2d29460e7c459d9f7baaab677f7578d952747d49ab2, cn=R A Nagargoje
Date: 2017.08.04 17:10:54 +05'30'

(र.आ. नागरगोजे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधान परिषद
२) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
३) अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व).
४) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो. पुणे
५) सर्व उप सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग मंत्रालय/बांधकाम भवन, मुंबई
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
७) अति. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
८) कार्यकारी अभियंता (बांधकाम) जिल्हा परिषद (सर्व)
९) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१०) निवड नस्ती कार्यासन पंरा-७ ग्रामविकास विभाग, बांधकाम भवन मुंबई